**राज्यातील चार कृषि विद्यापीठांना गृहनिर्माणासाठी कर्जे, गृह बांधणी अग्रीम साठीच्या अटी व शर्ती निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७१८/प्र.क्र.५३ (भाग-१)/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ नोव्हेंबर, २०१९.

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक - शादिक - २०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी, दि. ३० डिसेंबर, २०१४
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक - घबांअ - २०१२/प्र.क्र.३०/२०१२/विनियम, दिनांक २० फेब्रुवारी, २०१५.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक - घबांअ - २०१३/प्र.क्र.३०/२०१२/विनियम, दिनांक २२ मार्च, २०१९.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक - घबांअ - २०१२/प्र.क्र.३०/२०१२/विनियम, दिनांक २४ एप्रील, २०१९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील चार कृषि विद्यापीठांना मागणी क्रमांक डी-११, "६२१६ गृहनिर्माणासाठी कर्जे, या मुख्य लेखाशीर्षाखाली "५५, कर्जे व आगाऊ रक्कमा" या उपशीर्षांतर्गत अर्थसंकल्पीय तरतूदी वितरीत करण्यात येतात. संदर्भ क्र. २ नुसार, शासनाने दिलेल्या कर्जाचे लेखे अद्यावत ठेवण्यासाठी “महाऋण” या आज्ञावलीमध्ये कर्जाची माहिती अटी व शर्तीसह भरणे आवश्यक असल्यामुळे राज्यातील चारही कृषि विद्यापीठांना गृह बांधणी अग्रीमासाठी वितरीत करावयाच्या " कर्जे व आगाऊ रक्कमाबाबत" अटी व शर्ती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गृह बांधणी विषयक विविध प्रयोजनासाठी राज्यातील चारही कृषि विद्यापीठांना वितरीत करावयाच्या “कर्जे व आगाऊ रक्कमाबाबत” या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे अटी व शर्ती निश्चित करण्यात येत आहेत.

१. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. घबांअ-२०१२/प्र.क्र.३०/२०१२/विनिमय, दि. २०.०२.२०१५ अन्वये, घरबांधणी अग्रीमाच्या रकमेत तसेच घराच्या किंमत मर्यादेत सुधारणा करण्यात आलेली आहे. त्यानुसार घर बांधणी अग्रीम मंजूर करण्यात यावे.

२. राज्यातील चार कृषि विद्यापीठांतील अधिकारी / कर्मचाऱ्यांना घर बांधणी अग्रीम मंजूर करण्याकरीता सहाव्या वेतन आयोगानुसार, मुळ वेतन (वेतन बँड मधील मुळ वेतन + ग्रेड पे) विचारात घेण्यात यावा. सातव्या वेतन आयोगातील सुधारित वेतन संरचनेनुसार घर बांधणी अग्रीम मंजूर करणेबाबतचा शासन निर्णय अद्याप वित्त विभागामार्फत निर्गमित करावयाचा असल्याने प्रचलित दि.२०.०२.२०१५ चा शासन निर्णय लागू राहिल.

३. ज्यांना घरबांधणी अग्रीम मंजूर करावयाचे आहे, अशा अधिकारी / कर्मचारी यांची नियुक्ती संबंधित पदांच्या सेवाभरती नियमानुसार करण्यात आलेली असावी. नियुक्तीनंतर किमान ५ वर्षांची शासन सेवा झालेली असावी. त्याचप्रमाणे अग्रीम मंजूर करतेवेळी अधिकारी / कर्मचारी यांचा उर्वरीत सेवा कालावधी किमान ५ वर्षे असावा.

४. राज्यातील चार कृषि विद्यापीठांतील अधिकारी / कर्मचारी यांची घरबांधणी अग्रीम संपुर्ण शासन सेवेमध्ये एकदाच अनुज्ञेय आहे. तथापि अशा प्रकारे अग्रीम रकमेतून बांधलेल्या / खरेदी केलेल्या घराच्या नैसर्गिक आपत्तीतून उद्भवलेल्या दुरुस्तीकरीता विहित नियमानुसार रक्कम देय राहिल.
५. घर बांधणी नियम प्रयोजनातील कोणत्याही प्रयोजनासाठी अग्रिम घेण्याकरीता नोंदणीकृत गहाणखत आवश्यक राहिल. वैयक्तिक बंधपत्र / जामीनखत इ. कागदपत्रांची आवश्यकता राहिल.
६. पती / पत्नी दोघेही शासकीय कर्मचारी असतील तर त्यापैकी एकालाच विहित मर्यादेत घरबांधणी अग्रिम अनुज्ञेय राहिल.

७. **घर बांधणी अग्रिम व व्याजाची वसुली बाबत**-

७.१. अ) जमीन खरेदी करुन विहित कालावधीत घर बांधणी करणे / स्वत:च्या मालकीच्या जागेवर घर बांधणे किंवा जुने घर पाडून नवीन घर बांधणे / बांधकाम सुरु असलेले किंवा तयार नवीन घर खरेदी करणे

ब) एच.डी. एफ. सी., राष्ट्रियकृत बँका/ सहकारी बँका, महाराष्ट्र स्टेट हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन व तत्सम शासन मान्य वित्तिय संस्थाकडुन घरबांधणीच्या प्रयोजनासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी व

क) जुने घर विकत घेण्यासाठी या प्रयोजनाकरीता घरबांधणी अग्रीमाची वसुली कमाल २० वर्षात, प्रथम १९२ मासिक हप्त्यात मुळ अग्रिम व नंतर ४८ हप्त्यात व्याज वसुल करण्यात यावे.

७.२ अ) घर बांधण्यासाठी जमीन खरेदी करणे,

ब) स्वत:च्या मालकीच्या राहत्या घराचे नवीन बांधकाम करुन विस्तार करणे (एकदाही अग्रीम घेतलेले नसल्यास,

क) सध्याचे राहते घर निवास योग्य करण्यासाठी असाधारण व विशेष स्वरुपाची दुरुस्ती करणे या प्रयोजनाकरीता मंजूर अग्रिमाची वसुली करण्यासाठी प्रथम ७२ मासिक हप्त्यात मुळ अग्रिम व नंतर २४ हप्त्यात व्याज वसुल करण्यात यावे.अग्रिम धारक त्याच्या इच्छेनुसार मासिक हप्त्याची रक्कम वाढवू शकेल.

७.३ घर बांधणी अग्रिमाची रक्कम एकरकमी किंवा हप्त्यांमध्ये मंजूर केलेली असल्यास अग्रिमाची रक्कम एकरकमी / पहिला हप्ता वितरीत केल्यापासुन लगतच्या महिन्यापासुन वसुलीची सुरवात करावी.
८. घर बांधणी अग्रिम अनुज्ञेयता, मंजूरीची वित्तीय मर्यादा तसेच त्यावरील व्याज दराबाबत वित्त विभागामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयाप्रमाणे परिगणना करुन वसुली करण्यात यावी.
९. घर बांधणी अग्रिमाची वसुली करुन शासनाच्या खाती जमा करण्यासाठी लेखाशिर्ष -

६२१६- गृहनिर्माणासाठी कर्ज
८००- इतर कर्जे
(००)
(००) (०१) कृषि विद्यापिठे (६२१६ ५२१२)

१०. घर बांधणी अग्रिमावरील व्याज व दंडनीय व्याजाची वसुली करुन शासनाच्या खाती जमा करण्यासाठी लेखाशिर्ष -

११. घर बांधणी अग्रिम मंजूर, वितरण व वसुलीबाबतची कार्यवाही करण्यासाठी महाऋण प्रणालीचा वापर करणे आवश्यक आहे.

००४९- व्याजाच्या जमा रकमा
८००- इतर जमा रकमा
(०१) इतर जमा रकमा
(०१)(५३) कृषि विद्यापीठातील कर्मचाऱ्यांकडुन वसुल करावयाची गृह बांधणी अग्रीमावरील व्याजाची रक्कम (००४९ ५०४५) ०१

हा आदेश वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक - शादिक - २०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी, दिनांक ३० डिसेंबर, २०१४ च्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९११०७११५५०१६००१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gite Pratap Venkatrao

Digitally signed by Gite Pratap Venkatrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and Animal Husbandry, Dairying and Fisheries Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa90705dc27d17e7f5a948e535706ff2c3a1f6c3212fbe679cdac2da9677bb72, serialNumber=707437d6d784d92730d943579bec96a06c8b9d1b0f545fe42541583be9e598cd, cn=Gite Pratap Venkatrao
Date: 2019.11.29 12:23:47 +05'30'

**( प्रताप गिते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे-१,
३. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक/संचालक (शिक्षण)/विद्यापीठ अभियंता,महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
४. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक/संचालक (शिक्षण) विद्यापीठ अभियंता, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली,
५. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक/संचालक (शिक्षण)विद्यापीठ अभियंता, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
६. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक/संचालक (शिक्षण)/विद्यापीठा अभियंता, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
७. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर/दापोली/अकोला/परभणी,
८. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
९. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, जिल्हा अहमदनगर,
११. उपकोषागार अधिकारी, राहूरी, जिल्हा अहमदनगर,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, जिल्हा रत्नागिरी,
१३. उपकोषागार अधिकारी, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा अकोला,

१५. उपकोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा अकोला,
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी, जिल्हा परभणी,
१७. उपकोषागार अधिकारी, परभणी, जिल्हा परभणी,
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
२१. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
२२. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
२३. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२४. कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२५. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.